केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत करंजा, जि. रायगड येथील मत्स्यबंदराच्या बांधकामास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१५१४/प्र.क्र.१७०/पदुम-१४**
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०६ ऑगस्ट, २०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक मत्स्यवि-१००१/२६३६/(१९)/पदुम-१४, दिनांक २९.७.२००४
२) भारत सरकार, कृषि मंत्रालय, पदुम विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ३३०१३-४/२००५-Fy (H), दिनांक २४.३.२०११.
३) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र.मत्स्य/सा/०५१४०५/०५/२००५, दिनांक ६.१०.२०१०
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक मत्स्यवि- २०१०/प्र.क्र.२५७/पदुम-१४, दिनांक २/९/२०११
५) किनारी अभियंता, मुंबई यांचे पत्र क्र.किअ/प्रशा/Comp-१, दिनांक ३१ ऑगष्ट,२०१६
६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १.१२.२०१६
७) भारत सरकार, कृषि मंत्रालय, यांचे पत्र क्रमांक ३३०१३-४/२००५-Fy (H), दिनांक २८.३.२०१८

**प्रस्तावना -**

कोकण विकास कार्यक्रम २००० अंतर्गत करंजा, जि.रायगड येथे मत्स्यबंदराचे बांधकाम करणेबाबत संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २९.७.२००४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि दिनांक ११.६.२००५ रोजी केंद्रीय कृषि मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीमध्ये सदरहू काम हे केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत करण्याचे ठरले. त्यास अनुसरुन करंजा,जि.रायगड येथील मत्स्यबंदराचे बांधकामाच्या रु.७७,७३,४७,०००/- इतक्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता संदर्भाधिन दिनांक २.९.२०११ अन्वये देण्यात आली आहे.

सदर बांधकामाच्या भूस्तरातील बदल, काम सुरु असताना खडक लागल्यामुळे सदर खडकाचे खोदकाम वर होणारा खर्च, कामाच्या काही डिझाईनमधील बदल तसेच कामाच्या स्कोप मधील बदलामुळे सदर बांधकामाच्या संभाव्य खर्चातील वाढ विचारात घेता, सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित सुधारीत प्रकल्प आराखडा व अंदाज पत्रकास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन असल्यामुळे दिनांक १.१२.२०१६ अन्वये रु.१५३.९६ कोटी इतक्या निधीस मान्यता दिली आहे. त्यानंतर केंद्र शासनाने दिनांक २८.३.२०१८ रोजीच्या पत्रान्वये रु.१४९.८० कोटी इतका निधी ५०:५० हीश्श्या प्रमाणे मंजूरी दिली आहे. त्याचप्रमाणे किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी आवश्यक त्या स्तरावरील ना-हरकत परवानगी घेतल्यानंतर कामाला प्रत्यक्ष सुरुवात करावी असे नमूद केले आहे. मात्र सदरचे काम कार्यकारी अभियंता, आयुक्त मत्स्यव्यवसाय

यांचे कार्यालय, मुंबई यांचे मार्फत कार्यान्वयीत करावयाचे असल्याने त्याचप्रमाणे केंद्र शासनाने अतिरिक्त कार्यालयीन खर्च व अतिरिक्त आस्थापना खर्चास मान्यता दिली असल्याने, तसेच या योजनेकरिता यापूर्वी रु.९.३३ कोटी इतकी रक्कम मंजूर केलेली खर्च झालेली आहे. सदर रु.९.३३ कोटीची रक्कम या प्रकल्पातुन वगळून रु. १४९.८० कोटी इतक्या रक्कमेची सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय-**

केंद्र शासन पुरस्कृत केंद्र हिस्सा ५०%-५०% राज्य हिस्सा योजनेंतर्गत करंजा, जि.रायगड येथील मत्स्यबंदराच्या बांधकामासाठी खाली प्रपत्र अ अनुसार रू.१४९,८०,००,०००/- (रूपये एकशे एकोणपन्नासकोटी ऐंशी लाख मात्र) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सु-सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू काम हे केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत केंद्र हिस्सा ५०% व राज्य हिस्सा ५०% या तत्वावर तसेच केंद्र शासनाच्या संदर्भाधिन दिनांक २४.३.२०११ व दिनांक २८.३.२०१८ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात यावे.

३. यापूर्वी रु.९.३३ कोटीच्या किंमतीचे झालेले काम वगळून नव्याने निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही करावी.

४. कार्यकारी अभियंता, आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई यांनी आवश्यक त्या स्तरावरील ना-हरकत परवानगी प्राप्त करून घेतल्यानंतरच कामाला प्रत्यक्ष सुरूवात करावी.

५. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी सदर कामासंदर्भात कार्यकारी अभियंता, आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई यांचेसोबत दर तिमाही बैठक घेऊन कामाचा आढावा घ्यावा व शासनास वेळच्या वेळी प्रगती अहवाल सादर करावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:२९५/अर्थसंकल्प-२, दिनांक १३.१०.२०१६ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१८०८०६१६३०१००००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.08.06 16:46:15 +05'30'

**( विजय चौधरी )**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

३) प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

४) सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

५) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

६) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

७) सह आयुक्त (सागरी), आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

८) कार्यकारी अभियंता, आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

९) प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई विभाग, मुंबई

१०) किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई

११) पत्तन अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई

१२) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई

१३) सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१४) लेखा अधिकारी, आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई

१५) महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई

१६) सह सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय, पदुम विभाग, नवी दिल्ली

१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१८) निवासी लेखाधिकारी,मुंबई

१९) उप सचिव (मत्स्य), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

२०) वित्त विभाग (व्यय-२)/ अर्थसंकल्प-१५/अर्थोपाय/अर्थबळ, मंत्रालय, मुंबई

२१) कार्यासन अधिकारी, पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

२२) निवड नस्ती, पदुम-१४

## प्रपत्र अ

## सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकातील तरतूदी

| अ.क्र. | कामाचा वाव | तांत्रिक मान्यता रक्कम रुपये | |
|---|---|---|---|
| १ | अ) रेतीमध्ये ड्रेजिंग करणे | रु. | २८,५७,६८७.०० |
| | ब) नौकानयन मार्गातील खडक फोडणे. | रु. | ७७,७९,८१,६००.०० |
| | क) मातीचा भराव | रु. | ७,९६,१३,६६२.०० |
| | ड) ड्रेजिंग दगडाचा भराव | रु. | २४,०९,२८६.०० |
| २ | क्वे वॉल बांधणे (लांबी ५०३ मी.) | रु. | ३३,८९,२३,०८५.०० |
| ३ | ब्रेकवॉटर बांधणे..एकूण ४७५ मी) | रु. | ८,९९,३५,९७७.०० |
| ४ | रिवेटमेंट तयार करणे<br>अ) ५० से.मी.जाडीचा सेक्शन<br>ब) ३० सें.मी.जाडीचा सेक्शन | <br>रु.<br>रु. | <br>३५,८४,५०२.००<br>८,५९,५०१.०० |
| ५ | वाहतूक<br>अ) अंतर्गत डांबरी रस्ते<br>ब) अंतर्गत कॉंक्रीटचे रस्ते<br>क) पार्कींग स्थळ कॉंक्रीटीकरण<br>ड) डांबरी रस्ते (डब्ल्यू.बी.एम.) | <br>रु.<br>रु.<br>रु.<br>रु. | <br>६५,६७,२७०.००<br>१,७९,६७,३००.००<br>३,०१,९३,३२०.००<br>१,९९,४१२.०० |
| ६ | मासळी लिलावगृह | रु. | ४,३७,४७,०८३.०० |
| ७ | प्रशासकीय कार्यालय | रु. | ३२,२७,५४२.०० |
| ८ | गिअर शेड (२ नग) | रु. | ६६,१४,४८७.०० |
| ९ | जाळी विणण्याचे शेड | रु. | ४०,३८,५४२.०० |
| १० | कोळी बांधवांसाठी आराम गृह | रु. | ३४,७३,२२४.०० |
| ११ | उपहारगृह | रु. | ४२,३७,३८६.०० |
| १२ | रेडियो दळणवळण मनोरा | रु. | ४५,४६,३०३.०० |
| १३ | नौकानयन व रेडियो दळणवळण साहित्य | रु. | २५,००,०००.०० |
| १४ | सार्वजनिक शौचालय | रु. | ४२,०८,६६७.०० |
| १५ | चौकीदार गृह | रु. | ९,०३,०३७.०० |
| १६ | कंपाऊंड भिंत | रु. | ३९,२९,८२१.०० |
| १७ | सांडपाणी गटारे | रु. | १७,९४,१२२.०० |
| १८ | विद्युत पुरवठा वितरण व उपक्षेंद्र | रु. | १,२३,१८,६१५.०० |
| १९ | स्वच्छ पाणी पुरविण्याकरिता टाकी, पंपहाऊस | रु. | ५९,३२,५००.०० |
| २० | समुद्राचे पाणी पुरवठा, वितरण, पंपहाऊस व टाकी | रु. | १९,८८,०००.०० |
| २१ | सांडपाणी निचरा व प्रक्रिया व्यवस्था | रु. | ६०,००,०००.०० |
| २२ | हिरवाई, मुख्य प्रवेशव्दार, सौंदर्यीकरण | रु. | १५,००,०००.०० |
| २३ | भूगर्भ सर्व्हेक्षण, प्रतिकृती अभ्यास, माहिती जमा करणे | रु. | २०,००,०००.०० |
| २४ | पर्यावरण प्रभाव मुल्यांकन | रु. | १५,००,०००.०० |
| | **एकूण** | रु. | १,४६,५५,५१,९३१.०० |

| अ.क्र. | कामाचा वाव | तांत्रिक मान्यता रक्कम रुपये | |
|---|---|---|---|
| | **केंद्र शासन मान्यता** | रु. | १,४६,५५,५१,९३१.०० |
| | **ॲडीशनल** कॉन्टीजन्सी (कार्यालयीन खर्च) | रु. | १,९४,३५,१४१.०० |
| | **ॲडीशनल** वर्क चार्ज (आस्थापना खर्च) | रु. | १,२९,५६,७६१.०० |
| | **एकूण** | रु. | १,४९,७९,४३,८३३.०० |
| | **एकूण** | रु. | १,४९,८०,००,०००.०० |